20110114151635001

<u>पिंपरी-चिंचवड महानगरपालिका</u>
**मनपा आस्थापनेवरील सर्व्हेअर व उप लेखापाल या पदांच्या वेतनश्रेणीबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग**

शासन निर्णय क्र. पीसासी ३००५/२००९/प्र.क्र.२७८/०६/नवि-२२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :-५ मार्च,२००७.

**वाचा :-** (१) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. लेखा/३/कावि/१५३/०५, दिनांक २८/३/२००५ व त्यासोबतचा वेतन त्रुटी समितीचा अहवाल व महानगरपालिका ठराव क्र.५०६१, दिनांक ४/१२/२००३

(२) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३/कावि/४२६/०५, दिनांक २१/१२/२००५

(३) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३/ कावि/८०/ २००६ ,दिनांक २५/५/२००६

(४) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३/ कावि /१९६ / २००६ , दिनांक २९/८/२००६

(५) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. लेखा/३/कावि/४९२/ २००६, दिनांक ११/१२/२००६

<u>**प्रस्तावना :--**</u>

पिंपरी-चिंचवड महानगरपालिका कर्मचारी महासंघाने व काही कर्मचा-यांनी सातत्याने त्यांना लागू केलेल्या वेतनश्रेणीत त्रुटी असल्याने या त्रुटी दूर करणेबाबत मागणी केली होती. त्यासंदर्भात पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने महापालिकेतील वरिष्ठ अधिका-यांची व कर्मचारी महासंघाचे २ प्रतिनिधी यांची वेतनत्रुटी समिती गठित केली होती. या समितीने दिनांक ३/६/२००३ रोजी महानगरपालिकेस अहवाल सादर केला असून या अहवालानुसार ज्या पदांची वेतनश्रेणी सुधारित करणे आवश्यक आहे, त्याबाबत स्थायी समितीमार्फत महापालिका सभेपुढे विषय या प्रकरणी सादर करण्यात आला होता. पिंपरी-चिंचवड महानगरपालिका महासभेने ठराव क्रमांक ५०६१, दिनांक ४/१२/२००३ अन्वये त्यास मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी मनपाच्या आस्थापनेवरील काही संवर्गातील पदांच्या वेतनश्रेणीत सुधारित करण्याचा प्रस्ताव समर्थन व आस्थापना खर्चाच्या माहितीसह संदर्भाधीन पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर केला होता. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :--

आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी प्रस्तावित केल्यानुसार "सर्व्हेअर व उपलेखापाल" पदांची वेतनश्रेणी पुढील तक्त्यातील रकाना क्र.४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सुधारित करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ५१(४) अन्वये प्राप्त अधिकारात शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | सद्याची वेतनश्रेणी | सुधारित वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | सर्व्हेअर | रु.४०००-६००० | रु.४५००-७००० |
| २ | उपलेखापाल | रु.५०००-८००० | रु.५५००-९००० |

०२. या सुधारित वेतनश्रेणीचा प्रत्यक्ष लाभ या आदेशाच्या दिनांकापासून देय राहील.

०३. सदर वेतनश्रेणी सुधारणेबाबत सर्व सांविधानिक व विनियम विषयक बाबींची पूर्तता आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे यांनी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

( सुनील कोठेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
३. प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
४. निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई